विमानचालन संचालनालय, मुंबई येथील आस्थापनेवरील सहवैमानिक (विमान) या पदावर कॅ. मनिष काशिब यांची कायमस्वरूपी नियुक्ती करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.विचासं १११५/प्र.क्र.१५८/२८-अ
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ६ ऑक्टोबर, २०१५.

संदर्भ :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन २००९/प्र.क्र.५२६/०८/२८-अ, दि.१२.३.२०१०.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन १००९/प्र.क्र.६८१/२००९/२८-अ, दि.३१.३.२०१०.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन१००९/प्र.क्र.५७५/०९/२८-अ, दि ३.६.२०१०.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. विचासं १११५/प्र.क्र.१३१/२८-अ, दि.६.६.२०१५
५) शासनपत्र, सामान्य प्रशासन विभाग क्र. विचासं १११४/प्र.क्र.४७/२८-अ, दि.१५/०७/२०१५.

प्रस्तावना :-

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय, दिनांक १२.३.२०१० नुसार विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांच्या सुधारित आकृतिबंधास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय, दिनांक ३१.३.२०१० नुसार विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवरील मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर) / मुख्य वैमानिक (विमान) व वैमानिक या पदासाठी वेतनमान निश्चित करण्यात आले आहे. तसेच संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय, दिनांक ३.६.२०१० नुसार विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहवैमानिक (विमान) या पदावर कॅ. मनिष काशिब यांची ५ वर्षाच्या कालावधीसाठी करार पध्दतीने नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानंतर संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये कॅ. काशीब यांना सदर पदावर तीन महिन्यांची मुदतवाढ देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे संदर्भ क्र.५ व्दारे विमानचालन क्षेत्राशी संबंधित महत्वाच्या बाबींबाबत निर्णय घेण्यासाठी गठीत केलेल्या शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१९/०६/२०१५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त निर्गमित करण्यात आले आहे.

१.१ दिनांक १९.६.२०१५ रोजी झालेल्या शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत कॅ. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना कायमस्वरुपी शासन सेवेत सामावून घेण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

१.२ त्यानुसार कॅ. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना कायमस्वरुपी शासन सेवेत सामावून घेण्याबाबत सा.प्र.वि. (सेवा) व वित्त विभाग यांचे मान्यतेनुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे;

**<u>शासन निर्णय :-</u>**

२. संदर्भ क्र.२ येथील आदेशाव्दारे प्रदान केलेल्या अधिकारांनुसार विमानचालन संचालनालयातील वैमानिक या संवर्गातील मंजूर ५ पदांपैकी एक पद सहवैमानिक या संवर्गात अवनत करण्यात येत आहे. या अवनत केलेल्या पदावर सह वैमानिक (विमान) या संवर्गात कॅ. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांची दि.०१/०९/२०१५ पासून कायमस्वरूपी नियुक्ती खाली नमूद अटी व शर्तींच्या अधिनतेने करण्यात येत आहे;

**(अ) अटी व शर्ती**

१) श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांची राज्य शासनाच्या अधिनस्त विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवर सहवैमानिक (विमान) या पदावर दि.०१/०९/२०१५ पासून कायमस्वरूपी नियुक्ती झाल्यानंतर संदर्भाधीन दि.०६/०६/२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये त्यांची राज्य शासनाच्या विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवर कंत्राटीपद्धतीने सहवैमानिक (विमान) या पदावर नियुक्ती करण्याकरिता करण्यात आलेला करार आपोआप संपुष्टात येईल.

२) शासकीय कर्मचाऱ्यांकरिता विहीत केलेल्या वर्तणूक नियमांचे काटेकोरपणे पालन करणे श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांच्यावर बंधनकारक राहील.

३) शासकीय नियुक्तीबाबत महाराष्ट्र नागरी सेवा नियमांमध्ये काहीही नमूद असले तरीही श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब हे नेमणूकी पश्चात विमान उड्डाणासाठी अपात्र ठरल्यास त्यांची सेवा तात्काळ संपुष्टात येईल.

४) शासकीय नियुक्तीबाबत महाराष्ट्र नागरी सेवा नियमांमध्ये काहीही नमूद असले तरीही प्रशासकीय कारणास्तव किंवा इतर कारणास्तव शासकीय विमान सेवा बंद करण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतल्यास तसेच सहवैमानिक (विमान) या पदाची आवश्यकता नसल्यास श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांची सेवा समाप्त करण्याचे अधिकार शासनाकडे राखून ठेवण्यात येत आहेत.

५) श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना संदर्भाधिन शासन निर्णय दि.३१.०३.२०१० नुसार सहवैमानिक (विमान) या पदाकरीता अनुज्ञेय असलेले वेतन, भत्ते व सवलती अनुज्ञेय असतील. तसेच त्यांना शासकीय निवास स्थानाची सुविधाही लागू असेल. श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांची शासन निर्णय दि.०६.०६.२०१५ नुसार कंत्राटी पध्दतीवर नियुक्ती झाली असून ते सध्या सेवेमध्ये कार्यरत असल्यामुळे त्यांच्या कायम स्वरुपी नियुक्तीनंतर त्यांचे वेतन संरक्षित राहील. तसेच त्यांना विद्यमान “परिभाषिक अंशदान निवृत्ती वेतन योजना” लागू राहिल.

६) श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांनी सदर पदावर रूजू झाल्यापासून किमान ०८ वर्षे शासनाची सेवा करणे बंधनकारक राहील. संचालक, विमानचालन संचालनालय यांनी तसे बंधपत्र या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत घ्यावे. सेवानिवृत्तीची वयोमर्यादा डी.जी.सी.ए. च्या नियमांप्रमाणे असेल. नियुक्तीचा प्रथम ०८ वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर त्यांनी सेवा सोडल्यास, त्यांच्या कायमस्वरुपी नियुक्तीनंतरचे प्रशिक्षण, कायमस्वरुपी नियुक्तीनंतरचे परवाना नुतनीकरण, तसेच कायमस्वरुपी नियुक्तीनंतरच्या वैद्यकीय बाबींवर शासनाने मागील तीन वर्षात केलेल्या खर्चाची भरपाई तातडीने एकरकमी करण्याचे बंधन त्यांच्यावर राहील.

७) श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना शासकीय सेवेतून राजीनामा द्यावयाचा असल्यास त्याबाबत किमान एक वर्षाचा आगाऊ नोटीस कालावधी बंधनकारक राहील.

८) नियुक्तीनंतर एक महिन्याच्या कालावधीमध्ये श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांनी नियमानुसार डी.जी.सी.ए. यांनी दिलेले वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

९) श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना राज्य शासन नियमानुसार दैनिक भत्ता / प्रवास भत्ता, कार्यालयीन कामासाठी वाहन तसेच दुरध्वनी व अन्य सुविधा अनुज्ञेय असतील.

१०) या शासननिर्णयातील अन्य अटींच्या अधीनतेने श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना महाराष्ट्र नागरी सेवा नियमांच्या तरतूदी लागू राहतील. तसेच विमान उड्डाणाबाबत डी.जी.सी.ए. ने वेळोवेळी विहित केलेले नियम /सुचना त्यांच्यावर बंधनकारक राहतील.

११) श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना, लॉस ऑफ लायसन्स, विमा व वैयक्तिक अपघात तसेच रिन्युअल ऑफ लायसन्स व अनिवार्य चेक्सवरील खर्च डी.जी.सी.ए.च्या नियमाप्रमाणे अनुज्ञेय असेल.

१२) उक्त अटी व शर्तीमध्ये राज्य शासनाच्या धोरणानुसार वेळोवेळी आवश्यक ते बदल करण्याचा अधिकार शासनाकडे राहील. अशा प्रकारे धोरणात झालेले बदल श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांच्यावर बंधनकारक राहतील.

३. श्री. मनिष सुरेंद्रकुमार काशिब यांना अनुज्ञेय असलेले वेतनमान व इतर भत्ते, सुविधा यावरील खर्च संबंधित अर्थिक वर्षी मागणी क्र. ए-४, २०७०- इतर प्रशासनिक सेवा (००) (०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (२०७००१५६) या लेखाशिर्षांतर्गत ०१- वेतन या उद्दिष्टाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हे आदेश विमानचालन संचालनालयाच्या विविध समस्यांवर निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली कार्यरत असलेल्या शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १९.६.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या सेवा उपविभागाच्या सहमतीने (अनौ. संदर्भ क्र. १२०५/कार्या-१२, दिनांक ३१/५/२०१५) आणि वित्त विभागाच्या सहमतीने (अनौ. संदर्भ क्र.६१०/१५/व्यय४, दिनांक ४/८/२०१५ व क्रमांक अनौ.३४७/१५/ सेवा-९, दिनांक १२/८/१५) निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०१५१००६१६५२४५१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sameer Sawant

Digitally signed by Sameer Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=57b66327fd02392673b4ab4d6a85fdd38e27f3be70b7a6bddc9bea3f08d2330b, cn=Sameer Sawant
Date: 2015.10.31 16:53:48 +05'30'

**( समीर सावंत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
६) मा. राज्यपाल यांचे परिसहाय्यक, राजभवन, मुंबई.
७) सर्व मंत्री, उपमंत्री तसेच राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) संचालक / उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
१०) उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन २५), मंत्रालय, मुंबई.
११) कॅ. मनिष सुरेंद्रकुमार काशिब, विमानचालन संचालनालय, मुंबई
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१६) निवड नस्ती कार्यासन २८-अ, सा.प्र.विभाग, मंत्रालय, मुंबई.